**सुलवाडे जामफळ (कनोली) उपसा सिंचन योजना, जि. धुळे या प्रकल्पाच्या रुपये २४०७.६७ कोटी किंमतीच्या प्रथम सुधारित प्रकल्प अहवालास मान्यता देण्यात आलेली आहे, त्यातील अट क्र. १ ते ४ वगळण्याबाबत मा. मंत्रिमंडळाचा निर्णय...**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन शुद्धिपत्रक क्रमांक: सुप्रमा १०१३ /(प्र.क्र.६१९/१३)मोप्र-१)**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक:- २४ जुलै, २०१८.

**पहावे:-** १) महामंडळ निर्णय क्र.तापाविमं/ कासं / प्रवि-१/ प्रमा/७०/९९, दि.२/२/१९९९.

२) शासन निर्णय क्र. सुप्रमा १०१३/(प्र.क्र.६१९/१३)/मोप्र-१, दि.२/११/२०१७.

३) शासन शुद्धिपत्रक क्रमांक: सुप्रमा १०१३ )/प्र.क्र.६१९/१३ /मोप्र-१; दि.१५/३/२०१८

**प्रस्तावना:**

सुलवाडे जामफळ (कनोली) उपसा सिंचन योजना, शिंदखेडा व धुळे तालुका जि. धुळे या प्रकल्पाच्या जलसंपदा विभागाच्या सन २०१४-१५ च्या दरसूचीवर आधारित रुपये २४०७.६७ कोटी इतक्या किंमतीस अटींच्या अधीन राहून प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे.

तथापि, कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ ,जळगाव यांनी दि.३/११/२०१७ च्या पत्रान्वये सु.प्र.मा. आदेशातील अट क्र. ३ व ४शिथील करण्याबाबत केलेल्या विनंतीस अनुसरून सदर प्रस्ताव दि.१५/२/२०१८ रोजी झालेल्या व्यय अग्रक्रम समितीच्या बैठकित आयत्या वेळचा विषय म्हणून चर्चेस घेऊन चर्चेअंती समितीने अट क्र. २ मधील " **नियोजन"** शब्द वगळण्यास मान्यता दिली. त्या अनुषंगाने प्रस्तुत प्रकरणी दि.१५/३/२०१८ रोजी शुध्दीपत्रक निर्गमित करण्यात आले.

दरम्यान मा. ना. डॉ.सुभाष भामरे, रक्षा राज्यमंत्री, भारत सरकार, नवी दिल्ली यांनी मा.मुख्यमंत्री महोदयांना उद्देशून लिहीलेल्या पत्रान्वये सुलवाडे जामफळ योजनेच्या प्रथम सु.प्र.मा. मधील अटी वगळण्याबाबतची विनंती केली असून सदर पत्रावर प्राप्त निर्देशाच्या अनुषंगाने सदर प्रस्ताव पुन्हा दि.२३.४.२०१८ रोजी झालेल्या व्यय अग्रक्रम समितीच्या बैठकीमध्ये विचारार्थ ठेवण्यात आला असता समितीने "मा.मुख्यमंत्री महोदयांच्या निर्देशास अनुसरुन सदर प्रस्तावास मा. मंत्रिमंडळाची मान्यता घेण्यात यावी", असे निर्देशित केले.

सदर योजना केंद्र शासन अर्थसहाय्यित प्रस्तावित बळीराजा जल संजीवनी योजनेत समाविष्ट असल्याने प्रकल्पास आता निधी उपलब्ध होण्याची शाश्वती निर्माण झाल्याने मा.मंत्रिमंडळाने विस्तृत विचारांती दि.२७/०६/२०१८ रोजीच्या बैठकीमध्ये संदर्भ क्र. २ च्या शासन निर्णयातील अट क्र.१ ते ४ वगळण्याबाबत जाणीवपूर्वक निर्णय घेण्यास मान्यता दिली आहे. त्या अनुषंगाने खालीलप्रमाणे शुध्दीपत्रक निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन शुध्दीपत्रकः**

१. सुलवाडे जामफळ उपसा सिंचन योजनेच्या प्रथम सुधारित प्रशासकिय मान्यता आदेशातील क्र. १ ते ४ या अटी वगळण्यात येत आहेत. उर्वरित अटींमध्ये बदल नाही.

२. या आदेशान्वये संदर्भ क्र.३ चे शासन शुध्दीपत्रक अधिक्रमित करण्यात येत आहे.

सदर शासन शुद्धिपत्रक मा. मंत्रिमंडळाने दि.२७/०६/२०१८ रोजीच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन शुद्धिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१८०७२४११३२००३८२७ असा आहे. हे शुद्धिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sharad Shankar Dabhadkar

Digitally signed by Sharad Shankar Dabhadkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=531ee7ca7a2d3a1d0ad6391d978b4614a6f407abdc7276384df12925c283058f, cn=Sharad Shankar Dabhadkar
Date: 2018.07.24 11:33:01 +05'30'

**( श. शं. दाभाडकर )**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रत-**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
३) सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
५) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव.